हा श्रवणीं । लागतखेंवो समाधि आणी । ऐकिजि याही वाखाणी । काय व्यसन न कवी ॥४४॥ पाठ करितां व्याजें । पांडित्यें येती वेषजें । तैं अमृतातें भेणिजे । फावें[3]लिया ॥४५॥ तैसेंनि आइतेपणें । कवित्व जालें हें उपपणें । मनन निदिध्यास श्रवणें । जिंतिलें आतां ॥४६॥ हे स्वानंदभोगाची सेल । भलतयासीचि देईल । सर्वेंद्रियां पोषवील । श्रवणाकरवीं ॥४७॥ चंद्रातें आंगवणें । भोगूनि चकोर शाहाणे । परी फावे जैसें चांदिणें । भलतयाही ॥४८॥ तैसें अध्यात्म[8]शास्त्रीं यिये । अंतरंगचि अधिकारियें । परी लोकु वाक्चातुर्यें । होईल सुखिया ॥ ४९ ॥ ऐसें श्रीनिवृत्तिनाथाचें । गौरव आहे जी साचें । ग्रंथु नोहे हें कृपेचें । वैभव तिये ॥१७५०॥ क्षीरसिंधुपरिसरीं । शक्तींच्या कर्णकुहरीं । नेणों कैं श्रोत्रिपुं[11]रारीं । सांगितलें जें ॥५१॥ तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरो[12]दरीं गुप्तु । होता तयाचा हातु । पैठें जालें ॥५२॥ तो मत्स्येंद्र[13] सप्तशृंगीं । भग्नावयव[14] चौरंगी[15] । भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ॥५३॥ मग समाधि अव्यत्यया[16] । भोगावी वासना यया । ते मुद्रा[17] श्रीगोरक्षराया । दिधली मीनों[18] ॥५४॥ तेणें योगा[19]ब्जिनीसरोवरु । विषयविध्वंसैकवीरु । तिये पदीं कां सर्वेश्वरु । अभिषेकिले ॥५५॥ मग तिहीं तें शांभव[20] । अद्वयानंदवैभव । संपादिलें सप्रभव[21] । श्रीगहिनीनाथा ॥५६॥ तेणें कळिकळित[22] भूतां[23] । आला देखोनि निरुता[24] । ते आज्ञा श्रीनिवृत्तिनाथा । दिधली ऐसी ॥५७॥ ना आदिगुरु शंकरा- । लागोनि शिष्यपरंपरा । बोधाचा हा संसरा[25] । जाला जो आमुतें ॥५८॥ तो हा तूं घेऊनि आघवा । कळीं गिळितयां जीवां । सर्व प्रकारीं धांवां[26] । करीं पां वेगीं ॥५९॥ आधींच तंव तो कृपाळु । वरी गुरुआज्ञेचा बोलु । जाला जैसा वर्षाकाळु । सवकणें मेघां ॥१७६०॥ मग आर्तांचेनि वोरसें[27] । गीतार्थग्रंथनामिसें[28] । वर्षला शांतरसें । तो हा ग्रंथु ॥६१॥ तेथ पुढां मी बापियों[29] । मांडला आर्ती आपुलिया । कीं यासाठीं येवढिया । आणिलों यशा ॥ ६२ ॥ एवं गुरुक्रमें लाधलें । समाधिधन जें आपुलें । तें ग्रंथें बोधौनि दिधलें । गोसावी मज ॥६३॥ वांचूनि पढे ना वाची । ना सेवाही जाणे स्वामीची । ऐसिया मज ग्रंथाची । योग्यता कें असे ॥६४॥ परी साचचि गुरुनाथें । निमित्त करूनि मातें । प्रबंधव्याजें जगातें । रक्षिलें जाणा ॥६५॥ तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोलिलों पुरें उणें । तें तुम्हीं माउलीपणें । उपसाहिजो जी ॥६६॥ शब्द कैसा घडिजे । प्रमेयीं[30] कैसें पां चढिजे । अलंकारु म्हणिजे । काय तें नेणें ॥६७॥ सायिखडेयाचें बाहुलें । चाळविल्या सूत्राचेनि चाळे । तैसा मातें दावीत बोलें । स्वामी तो माझा ॥६८॥ यालागीं मी गुणदोष- । विषीं क्षमाविना विशेष । जे मी संजात[31] ग्रंथलों देख । आचार्यें कीं ॥ ६९ ॥ आणि तुम्हां संतांचिये सभे । जें उणिवेंसीं ठाके उभें । तें पूर्ण नोहे तैं लोभें । तुम्हांसीचि कोपे ॥१७७०॥ सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे[32] । न मुकिजे अनायासें । तैं कवणा बोलु ॥७१॥ वोहळें हेंचि करावें । जे गंगेचें आंग ठाकावें । मगही गंगा जरी नोहावें । तैं तो काय करी ॥७२॥ म्हणौनि भाग्ययोगें बहुवें । तुम्हां संतांचे मी पाये । पातलों आतां कें आहे । उणें जगीं ॥७३॥ अहो जी माझेनि स्वामी ।

---

१ व्याख्यानरूपानें. २ शुद्ध. ३ मिळालें असतां. ४ उत्पत्तिस्थान; विश्रांतिस्थान. ५ आपल्या शक्तीनें. ६ आत्मानात्मविचार. ७ जितेंद्रिय. ८ पलीकडे. ९ पार्वतीच्या. १० कानांत. ११ श्रीशंकरांनीं. १२ माशाच्या पोटांत. १३ मत्स्येंद्रनाथ. १४ हातपाय तुटलेल्या. १५ चौरंगीनाथ. १६ अचल. १७ ज्ञानमुद्रा. १८ मत्स्येंद्रनाथांनीं. १९ योगरूप कमलिनीचें. २० शंकरांपासून परंपरेनें आलेलें. २१ संपूर्ण. २२ कलीनें ग्रस्त झालेल्या. २३ प्राणिमात्रास २४ खरा. २५ ऐश्वर्य. २६ धावून रक्षण कर. २७ कळकळीनें. २८ ग्रंथ करण्याच्या उद्देशानें. २९ चातक पक्षी. ३० अर्थीं. ३१ जांगड. ३२ वाईट स्थिति; कमीपणा.

माझा ग्रंथ श्रवणांत (कानांत) पडतांक्षणींच समाधि आणितो; मग त्याचें व्याख्यान ऐकल्यावर तो पुनः ऐकण्याविषयीं नाद लावणार नाहीं काय? ४४ या माझे ग्रंथाचा पाठ करीत असतां जर वक्तृत्व केलें, तर त्यापासून उत्पन्न होणारी गोडी अमृतालाही मागें टाकते. ४५ तसें हें अमृताहून सुरस आयतें कवित्व श्रीगुरुप्रसादानें उत्पन्न झालेलें, याच्या श्रवणानें मनन व निदिध्यास यांस जिंकिलें आहे. ४६ हें वाटेल त्यास आत्मरूपाच्या आनंदाचा शेलका वांटा घेववील, व श्रवणाकडून सर्व इंद्रियांची तृप्ति करवील. ४७ आपल्या शक्तीनें चतुर चकोर पक्षी चंद्राचे अमृताचा जसा उपभोग घेतात, तसा सर्वांना उपभोग घेतां येत नाहीं; तरी चांदण्याचा उपभोग सर्वांस होतो. ४८ तसा या अध्यात्मशास्त्रापासून जितेंद्रिय पुरुष जे अधिकारी आहेत त्यांनाच खरा आनंद प्राप्त होतो; परंतु इतर लोकांना वाणीच्या सौंदर्यापासून सुख होतें. ४९ अशा प्रकारचें श्रीगुरु निवृत्तिनाथांचें खरें ऐश्वर्य आहे, म्हणून हा माझा ग्रंथ नसून त्यांच्या कृपेचें वैभवच होय. १७५० क्षीरसिंधूच्या पलीकडे पार्वतीचे कानांत श्रीशंकरांनीं जें ज्ञान सांगितलें,—केव्हां सांगितलें तें माहीत नाहीं. ५१ ते ज्ञान, क्षीरसमुद्रामध्यें माशाचे पोटांत जे गुप्तरूपानें होते त्यांना प्राप्त झालें. ५२ ते मत्स्येंद्रनाथ सहज संचार करितां करितां सप्तशृंगावर आले. तेथें, ज्याचे अवयव मंगलेलें होते असे चौरंगीनाथ हे मत्स्येंद्रनाथांचें दर्शन होण्याबरोबर सर्व अवयवांनीं परिपूर्ण झाले. ५३ मग, त्या अचल समाधीचा उपभोग घ्यावा या इच्छेनें ते आपलें ऐश्वर्य मत्स्येंद्रनाथांनीं गोरक्षनाथास दिलें ५४ त्या मत्स्येंद्रनाथांनीं योगरूप कमलिणी धारण करणारें सरोवर व विषयविध्वंस करण्याविषयीं महाशूर असे जे गोरक्षनाथ, त्यांजला आपले योगैश्वर्याचे पदावर बसवून राज्याभिषेक केला. ५५ त्यानंतर, शंकरांपासून परंपरेनें आलेलें जें अद्वयानंदसुख, तें गहिनीनाथ यांनीं गोरक्षनाथांपासून संपूर्ण संपादन केलें. ५६ मग, कलीनें सर्व भूतांचा ग्रास केलेला आहे असें पाहून गहिनीनाथांनीं श्रीनिवृत्तिनाथांना अशी आज्ञा केली ५७ कीं, आदिगुरु शंकरांपासून शिष्यपरंपरेनें जे हें बोधाचे ऐश्वर्य आमचे कुळांत प्राप्त झालें आहे, ५८ तें तूं घेऊन कलीनें त्रस्त केलेले जिवांना दुःखापासून सर्व प्रकारें मुक्त कर. ५९ अगोदर श्रीनिवृत्तिनाथ हे दयाळू असून त्यांत श्रीगुरूची आज्ञा झाल्यावर परमानंद झाला. जसा मेघ वृष्टि करण्याविषयीं स्वतः उत्सुक असून त्यांतच वर्षाकाळ आल्यावर तो अत्यंत खवळतो तसा १७६० मग, पीडित झालेल्या जनांला दुःखापासून सोडवावें या कळकळीनें गीतेचा अर्थ करण्याचे मिषानें ब्रह्मरसाचा जो त्यांनीं वर्षाव केला, तो हा ग्रंथ होय. ६१ तेथें मीं चातकासारखा गुरूचा प्रसाद प्राप्त व्हावा अशी इच्छा करून बसलेला अनन्य शिष्य पाहून मजवर त्यांनीं कृपा केली, म्हणून मी या यशास प्राप्त झालों. ६२ अशा प्रकारेंकरून गुरुपरंपरेनें प्राप्त झालेलें समाधिधन एके ठिकाणीं बांधून श्रीनिवृत्तिनाथांनीं मजला दिलें. ६३ एरवीं, मीं अध्ययन केलें नाहीं व कांहीं ऐकलेंही नाहीं; व तसेंच स्वामीची सेवा करण्याचेंही मला ज्ञान नाहीं; मग ग्रंथ करण्याची योग्यता कोठून येणार? ६४ परंतु वास्तविक पाहिलें असतां, श्रीगुरूंनीं माझें निमित्त करून जो ग्रंथ केला, त्या योगानें सर्व जगाचें संरक्षण झालें आहे. ६५ याजकरितां, मी पुरोहिताप्रमाणें जें कांहीं न्यूनाधिक बोललों असेन, तें तुम्ही आईप्रमाणें सहन करा. ६६ शब्दाची रचना कशी करावी, व त्याचा अर्थ कसा चढता असावा, व अलंकार कशाला म्हणतात, हें मला माहीतही नाहीं. ६७ कळसूत्री बाहुलें जसें, सूत्रधारानें हालविल्याप्रमाणें हालतें, तसें माझ्या गुरूंनीं जें जें अंतःकरणांत प्रकाशित केलें तें मी बोललों; ६८ म्हणून, माझ्या ग्रंथांतील गुणदोष सहन करा असें मी म्हणत नाहीं; कारण माझ्या गुरूंनीं मजजवळ ठेविलेला जांगड ग्रंथ मीं आपल्या पुढें मांडला आहे. ६९ आणि तुम्हां संतजनांच्या सभेंत एखाद्या गोष्टीचा उणेपणा नाहींसा न होईल तर लडिवाळपणें तुम्हांवरच दोष येईल. १७७० लोखंडाचा कमीपणा परिसाच्या स्पर्शानें जर सहज नाहींसा होणार नाहीं, तर त्याचा दोष कोणाकडे येईल? ७१ ओहोळानें इतकेंच करावें कीं गंगेस जाऊन मिळावें; मग जर त्याला ती आपल्यांत स्वीकार करून न घेईल (पवित्र न करील), तर त्याच्याकडे काय दोष आहे? ७२ म्हणून, महद्भाग्याच्या योगानें मी तुम्हां संतजनांच्या पायांजवळ आलों आहें; तर आतां या जगतांत मला काय कमी आहे? ७३ अहो, काय सांगावें! माझ्या गुरूंनीं तुम्हां संत-

मज संत जोडूनि तुम्हीं । द्विभलेति तेणें सर्वकामीं। परिपूर्ण जालों ॥७४॥ पाहा पां मातें तुम्हां सांगडें। माहेर तेणें सुरवाडें । ग्रंथाचें आळियोडें । सिद्धी गेलें ॥७५॥ जी कनकाचें निखळ । वोतूं येईक भूतळ । चिंतारत्नीं कुळाचेंळ । निर्मूं येती ॥७६॥ सातांही हो सागरांतें । सोपें भरितां अमृतें । दुवाड नोहे तारांतें । चंद्र करितां ॥७७॥ कल्पतरूचे आराम । लाविता नाहीं विषम । परी गीतार्थाचें वर्म। निवडूं नये ॥७८॥ तो मी येकु सर्व मुका । बोलोनि मऱ्हाटिया भाषा । करीं डोळेवरी लोकां । घेवों ये ऐसें ॥ ७९ ॥ हा ग्रंथसागरु येव्हडा । उतरोनि पैलीकडा । कीर्तिविजयाचा घेंडा । नाचें जो कां ॥१७८०॥ गीतार्थाचा आवारु । कळसेंसीं महामेरु । रचूनि माजीं श्रीगुरु । लिंग जें पूजीं ॥८१॥ गीता निष्कपट माय । चुकोनि तान्हें हिंडे जें बाय । ते मायपूतां भेटी होय । हा धर्म तुमचा॥८२॥ तुम्हां सज्जनांचें केलें । आकलुनी जी मी बोलें । ज्ञानदेव म्हणे थेंकुलें । तैसें नोहे॥८३॥काय बहु बोलों सकळा । मेळविलों जन्मफळा । ग्रंथसिद्धीचा सोहळा । दाविला जो हा ॥८४॥ भियां जैसजैसिया आशा । केला तुमचा भरंवसा । ते पुरवूनि जी बहुवसा । आणिलों सुखा ॥८५॥ मजलागीं ग्रंथाची स्वामी । दुजी सृष्टी जे हे केली तुम्हीं । ते पाहोनि हांसों आम्हीं । विश्वामित्रातेंही ॥ ८६ ॥ जे असोनि त्रिशंकुदोषें[11] । धातयाही आणावें खोखें[12] । तें नासतें कीजे कीं ऐसें । निर्मावें नाहीं ॥८७॥ शंभू उपमन्यूचेनि मोहें । क्षीरसागरुही केला आहे । येथ तोही उपमेसरी नोहे । जे विषगर्भ कीं ॥८८॥ अंधकारु निशाचरां । गिळितां सूर्यें चराचरां । धांवा केला तरी खरा । ताउनी कीं तो ॥ ८९ ॥ तांतकिया[13] जगाकारणें । चंद्रें वेंचिलें चांदणें । तया सदोषा केंवि म्हणें । सारिखें हें ॥१७९०॥ म्हणोनि तुम्हीं मज संतीं । ग्रंथरूप जो हा त्रिजगतीं । उपयोग केला तो पुढती । निरुपम जी ॥ ९१ ॥ किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी नेलें । येथ माझें जी उरलें । पाईकपणें[14] ॥ ९२ ॥ आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें[15] तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान[16] हें ॥ ९३ ॥ जे खळाची व्यंकटी[17] सांडो । तया सत्कर्मीं रती[18] वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ ९४ ॥ दुरितांचें[19] तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ९५ ॥ वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी । अनवरत[20] भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ९६ ॥ चला[21] कल्पतरूंचे आरव[22] । चेतना[23] चिंतामणीचे गांव । बोलते जे अर्णव[24] । पीयूषांचे[25] ॥९७॥ चंद्रमे जे अलांछन[26] । मार्तंड[27] जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे[28] होतु ॥ ९८ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं । भजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥९९॥ आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकीं इयें । दृष्टादृष्टविजयें । होआवें जी ॥१८००॥ तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो[31] । येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला॥१॥ऐसें युगीं परी[32] कळीं । आणि महाराष्ट्रमंडळीं । श्रीगोदावरीच्या कूळीं[33] । दक्षिणलिंगीं ॥ २ ॥ त्रिभुवनैकपवित्र अनादि पंचक्रोशक्षेत्र[34] । जेथ जगाचें जीवनसूत्र । श्रीमहालया[35] असे ॥३॥ तेथ

१ अनुकूल. २ छंद. ३ कुलपर्वत. ४ बाग. ५ कठीण. ६ दृष्टिगोचर. ७ देवालय. ८ कळस. ९ मायलेंकरांची. १० अल्प. ११ त्रिशंकु राजाच्या हेतूनें. १२ कमीपणा. १३ तप्त झालेल्या. १४ सेवकपण. १५ ग्रंथरूप यज्ञानें. १६ प्रसाद. १७ वक्रदृष्टि; कुटिलपणा. १८ प्रीति. १९ पातकाचें.

२० सद्भावानें; सर्वकाळ. २१ चालत्या. २२ बाग; अंकुर. २३ जिवंत. २४ समुद्र. २५ अमृताचें. २६ कलंकरहित. २७ सूर्य. २८ प्रिय. २९ इहपरलोकीं. ३० सद्गुरु. ३१ दानप्रसाद. ३२ कलियुगांत. ३३ तीरास. ३४ पंचक्रोशींत. ३५ श्रीमोहनीराज.

नांची भेट करून दिली, ह्या योगानें माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झाल्या आहेत. ७४ पहा कीं, तुमचेसारखें अनुकूल माहेरघर मला मिळालें, म्हणून हा ग्रंथ करण्याचा माझा छंद सिद्धीस गेला. ७५ एरवीं सर्व पृथ्वी निखळ सोन्याची करतां येईल, व कुलपर्वत चिंतामणीचे करितां येतील; ७६ सात समुद्र अमृतानेंही भरण्याचें सोपें आहे; तान्यांना चंद्र करणें हेंही कठीण नाहीं; ७७ कल्पतरूचे बाग लावण्यांत कांहीं कठीण नाहीं: [या सांगितलेल्या सर्व गोष्टी तपाच्या बळानें करतां येतील,] परंतु गीतेच्या अर्थाचें वर्म [गुरुप्रसादाशिवाय] समजावयाचें नाहीं. ७८ तो मी सर्व प्रकारें मुका असून, गुरूच्या कृपेनें गीतेचा अर्थ मराठींत अशा रीतीनें केला आहे कीं, सर्व लोकांना प्रत्यक्ष डोळ्यांनीं दिसावा; ७९ व त्याच्याच कृपेनें एवढा ग्रंथरूपी सागर तरून पलीकडे कीर्तिरूप विजयाचा झेंडा नाचविला. ८० गीतेचें अर्थरूप देवालय अठरावे अध्यायरूपी कळसासुद्धां रचून त्यांत श्रीगुरूचें लिंग स्थापन करून त्यांची पूजा केली. ८१ गीता ही निष्कपट आई असून, मुमुक्षु हीं जीं तिचीं लहान पोरें, त्यांची व तिची चुकामूक पडून जीं तीं सैरावैरा हिंडतात, त्या मायलेंकरांची गांठ पाडणें हा तुम्हां संतजनांचा धर्म आहे. ८२ ज्ञानदेव म्हणतात कीं, तुम्हीं संतजनांनीं जी कृपा केली, व त्यामुळें मी जें बोललों, तें, अल्प नव्हे. ८३ फार काय सांगूं? हा ग्रंथ शेवटास गेल्यामुळें मला माझ्या सर्व पूर्वजन्मांचें फळ तुम्हीं प्राप्त करून दिलें आहे. ८४ मीं तुमच्यावर भरंवसा ठेवून जी जी इच्छा केली ती सर्व तुम्हीं पुरवून मी सुखास पात्र झालों. ८५ हे गुरो, तुम्ही माझ्याकरितां जी गीतार्थरूपी ग्रंथाची नवी सृष्टि केली, ती पाहून आम्ही विश्वामित्राच्या सृष्टीला हसतों. ८६ कारण, ती नाशवंत सृष्टि त्रिशंकु राजाचे उद्देशानें ब्रह्मदेवास कमीपणा आणावा या हेतूनें विश्वामित्रांनीं उत्पन्न केली, तशी ही आपण केलेली सृष्टि नाशवंत नसून शाश्वत आहे. ८७ शंकरांनीं आपला भक्त उपमन्यु याच्या ममतेनें त्याच्याकरितां क्षीरसागरही उत्पन्न केला, तो जर या ग्रंथाच्या बरोबर आहे म्हणावें, तर तो विषगर्भ आहे, (समुद्रमंथनाचे वेळेस त्याच्यांतून हलाहल विष निघालें.) ८८ प्राणिमात्राला अंधकार व निशाचर यांची पीडा होऊं नये म्हणून त्यांनीं धावा केला असतां सूर्यानें त्याच्या दुःखाचा आपले तेजानें परिहार केला खरा, परंतु त्याच्या तेजाचे उष्णतेनें जीवमात्राला त्रास होतो, हा त्याच्यांत कमीपणा आहे. ८९ तप्त झालेल्या जगास चंद्रानें आपल्या चांदण्यानें शांत केलें, तो चंद्र कलंकानें युक्त आहे; म्हणून त्या दोषयुक्त चंद्रासारखा हा ग्रंथ आहे असें कसें म्हणावें? ९० याकरितां, तुम्ही संतजनांनीं माझ्याकडून त्रैलोक्याला उपयोग व्हावा म्हणून जो ग्रंथ करविला, तो अनुपम आहे. ९१ फार काय सांगावें? तुमच्या कृपेनें धर्मरूप कीर्तन शेवटास गेलें; तर माझें आतां इतकेंच काम राहिलें आहे कीं, आपली सेवा करावी. ९२ आतां यावर, विश्वस्वरूप सद्गुरु यांनीं माझ्या वाग्यज्ञेंकरून संतुष्ट होऊन मजला हा प्रसाद द्यावा ९३ कीं, दुष्टांचा कुटिलपणा जाऊन त्यांना सत्कर्मांची प्रीति उत्पन्न होवो; व जीवमात्राची एकमेकावर मैत्री वाढो. ९४ या सर्व विश्वामधील पापरूपी अंधकार नाहींसा होऊन स्वधर्मरूपी सूर्य उगवून त्याचा प्रकाश होवो, आणि प्राणिमात्राच्या ज्या ज्या इच्छा असतील त्या त्या पूर्ण होवोत. ९५ या भूतलावर अखिल मंगलाचा वर्षाव करणाऱ्या भगवद्भक्तांच्या समुदायांची सर्व भूतांना सद्भावेंकरून सदोदीत भेट होवो. ९६ ते भक्तजन कसे आहेत, तर चालतेबोलते कल्पतरूचे बाग, जिवंत चिंतामणींचे गांव, किंवा अमृताचे चालतेबोलते समुद्रच होत. ९७ जे कलंकरहित प्रतिचंद्र, संसाररूपी अंधकार दूर करून शांतिसुख देणारे प्रतिसूर्य असे भगवद्भक्त, ते सकल जीवांना प्रिय होवोत ९८ फार काय मागावें? सर्व त्रैलोक्य सुखानें परिपूर्ण होऊन प्राणिमात्राला हरीचें अखंड भजन करण्याची इच्छा होवो. ९९ आणि या ग्रंथावरच ज्यांचें उपजीवन आहे, त्यांना इहलोकचें व परलोकचें सुख प्राप्त होवो. १८०० तेव्हां सद्गुरु प्रसन्न होऊन म्हणाले कीं, तुझ्या म्हणण्याप्रमाणें सर्व होईल. असें वरप्रदान मिळाल्यानें श्रीज्ञानदेव फार संतोषित झाले. १ याप्रमाणें कलियुगामध्यें, महाराष्ट्र देशांत, श्रीगोदावरीच्या दक्षिण तीरास, २ त्रैलोक्यांत पवित्र व अनादि पंचक्रोश क्षेत्र नेवासें—ज्या ठिकाणीं सर्व जगताचें जीवनसूत्र श्रीमोहनीराज आहेत, ३ त्या क्षेत्रांत, सकल कलांनीं संपूर्ण, व पृथ्वीचा

यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु । न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥४॥ तैं महेशान्वयसंभूतें । श्रीनिवृत्तिनाथसुतें । केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ॥५॥ एवं भारताच्या गांवीं । भीष्मनाम प्रसिद्ध पर्वीं । श्रीकृष्णार्जुनीं बरवी । गोठी जे केली ॥६॥ जें उपनिषदांचें सार । सर्व शास्त्रांचें माहेर । परमहंसीं सरोवर । सेविजे जें ॥७॥ तिये गीतेचा कलशु । संपूर्ण हा अष्टादशु । म्हणे निवृत्तिदासु । ज्ञानदेवो ॥८॥ पुढती पुढती पुढती । इया ग्रंथ पुण्यसंपत्ती । सर्वसुखीं सर्वभूतीं । संपूर्ण होइजे ॥९॥ शके बाराशतें बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें । सच्चिदानंदबाबा आदरें । लेखकु जाहला ॥१८१०॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

इति श्रीभावार्थदीपिका समाप्ता ॥

श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## श्रीएकनाथ महाराजांनीं ज्ञानेश्वरीचें संशोधन केल्यावर त्यासंबंधें लिहिलेल्या ओंव्या.

श्रीशके पंधराशें साहोत्तरीं । तारणनामसंवत्सरीं । एकाजनार्दन अत्यादरीं । गीता-ज्ञानेश्वरी प्रतिशुद्ध केली ॥१॥ ग्रंथ पूर्वींच अतिशुद्ध । परी पाठांतरीं शुद्ध अबद्ध । तो शोधूनियां एवंविध । प्रतिशुद्ध सिद्धज्ञानेश्वरी ॥२॥ नमो ज्ञानेश्वरा निष्कळंका । जयाची गीतेची वाचितां टीका । ज्ञान होय लोकां । अतिभाविकां ग्रंथार्थियां ॥३॥ बहुकाळपर्वणी गोमटी । भाद्रमास कपिलाषष्ठी । प्रतिष्ठानीं गोदातटीं । लेखनकामाठी संपूर्ण जाली ॥४॥ ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेविली ॥५॥



धनी व न्यायानें प्रजेचें पालन करणारा यदुकुळास भूषण देणारा रामराजा राज्य करीत होता, ४ त्या वेळेस, ज्या श्रीनिवृत्तिनाथ महाराजांची परंपरा श्रीशंकरांपासून आहे, त्यांचे शिष्य ज्ञानदेव यांनीं श्रीमद्भगवद्गीतेस मराठी भाषेचें लेणें केलें. ५ याप्रमाणें भारतांतील प्रसिद्ध भीष्मपर्वांत श्रीकृष्णार्जुनांचा जो उत्तम संवाद झाला; ६ जें उपनिषदांचें सार असून सर्व शास्त्रांचें माहेर व परमहंस साधूंचें क्रीडा करण्याचें सरोवरच होय; ७ त्या गीतेचा अठरावा अध्याय हा कळस आहे, असें श्रीनिवृत्ति महाराजांचे शिष्य ज्ञानदेव म्हणतात. ८ उत्तरोत्तर या ग्रंथाच्या पुण्यरूप संपत्तीनें जीवमात्राला सर्व सुखाचा पूर्ण लाभ होवो. ९ शके १२१२ मध्यें ही टीका ज्ञानेश्वर महाराजांनीं करून सच्चिदानंदबाबांनीं अति आदरानें लिहिली. १८१०

शके १५०६ तारण नाम संवत्सरांत जनार्दन महाराजांचे शिष्य एकनाथ स्वामी यांनीं गीता-ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. १ ग्रंथ मूळचाच अति शुद्ध होता, परंतु लोकांच्या पाठभेदांनें कोठें कोठें अबद्ध झाला होता, तो पाहून ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध केली. २ ज्यांची गीतेवरील टीका वाचली असतां भाविक वाचणारांला गीतेचें संपूर्ण ज्ञान होतें, त्या निष्कलंक ज्ञानेश्वर महाराजांस नमस्कार असो. ३ पुष्कळ कालानें प्राप्त होणारा जो उत्तम कपिलाषष्ठीचा योग भाद्रपद वद्य षष्ठी, त्या दिवशीं गोदेच्या तीरीं पैठण क्षेत्रांत ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करण्याचें काम समाप्त झालें. ४ ज्ञानेश्वरीचे पाठांत जो महाराष्ट्र भाषेंत ओंवी करून घालील, त्यानें अमृताचे ताटांत नरोटी ठेवल्याप्रमाणें होईल असें समजावें.



# पारिभाषिक शब्द.

**अन्न-चतुर्विध**-भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य.

**अंगें**-योगाचीं आठ अंगें-यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि.

**अवस्था**-५-जागृति, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या व उन्मनी.

**आसनें**-८४-आहेत. पैकीं सिद्ध, पद्म, वीर, भद्र व वज्र हीं मुख्य होत.

**इंद्रियें-५-ज्ञानेंद्रियें**- श्रवण, नयन, त्वचा, घ्राण, व रसना.५ **विषय**-शब्द, रूप, स्पर्श, गंध व रस.

५ **कर्मेंद्रियें**-वाक्,पाणी,पाद, पायु, उपस्थ.

५ **विषय**-बोलणें, घेणें, चालणें, गुद=मलत्याग करणें व शिश्न=मूत्रत्याग करणें.

**ऋतु**-६-वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद्, हेमंत व शिशिर.

**कपिलाषष्ठी**-हें पर्व बहुधा ६० वर्षांनीं एकदा येतें. हें पर्व येण्यास महिना भाद्रपद, पक्ष कृष्ण, तिथि षष्ठी, वार मंगळ, नक्षत्र रोहिणी, योग व्यतीपात् आणि महानक्षत्र हस्त, इतके योग यावे लागतात.

**कर्म**-नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध. ( अ. १८ श्लोक २ वरील टीका पहा.)

**काम**-कोणत्याही पदार्थांची वारंवार इच्छा होणें.

**कुलाचल**-७-महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष, विंध्य आणि पारियात्र हे सात कुलपर्वत होत.

**गुण**-३-सत्त्व = ज्ञानशक्ति = ज्ञानेंद्रियें.
रज = क्रियाशक्ति = कर्मेंद्रियें.
तम = पदार्थशक्ति= विषय.

**गुरु**-४-गुरु, परमगुरु, परमेष्ठिगुरु, व परात्परगुरु.

**चक्रें**-६-आधार=गुद, लिंग, नाभी, हृदय, तालुमूल=कंठ व ललाट.

**चिरंजीव**-७-अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान्, बिभीषण, कृप व परशुराम.

**चित्तचतुष्टय**-बुद्धि, मन, अहंकार व चित्त.

**छंद**-७-गायत्री, उष्णिक्, अनुष्टुभ्, बृहती, पंक्ती, त्रिष्टुप् व जगती. ( ८ अक्षरांचा चरण; ३२ अक्षरांचा छंद. २४ अक्षरांची गायत्री. )

**त्रिविधताप**-आध्यात्मिक,आधिदैविक,आधिभौतिक.

**दिग्गज**-८-ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, पुष्पदंत, सार्वभौम आणि सुप्रतीक.

**देवतरु**-५-मंदार, पारिजात, संतान, कल्पवृक्ष व हरिचंदन.

**धातु**-शरीरांतील **सप्तधातु** व त्यांचें प्रमाण.

| रक्त, | मांस, | मज्जा, | मेद, | रस, | अस्थि व | शुक्र. |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ | १० | २ | ३ | ४ | ३ | १/२ |

एकूण ३०१/२.

**पथ-चतुष्पथ**-प्रज्ञानब्रह्म, तत्त्वमसि, अयंआत्माब्रह्म,
ऋक्शाखा, छांदोग्यांतील सामं, अथर्ववेद,
अयंब्रह्मास्मि.
यजुःशाखा.

**पुरुषार्थ**-४-धर्म, अर्थ, काम व मोक्ष.

**प्रकृति**-(अष्टधा) अप्, तेज, गगन, मही, मारुत, मन, बुद्धि व अहंकार. पराप्रकृति=चेतन, अपराप्रकृति=जड.

**प्रमाणें**-६-शाब्द, अनुमान, उपमान, प्रत्यक्ष, अर्थापत्ति, व अनुपलब्धि.

**प्राण**-५-प्राण, अपान, व्यान, उदान व समान.
उपप्राण ५. नाग=तोंड वासणें (जांभई), कूर्म=शिंक, कृकर = भूक उत्पन्न करणें (ढेंकर), देवदत्त=उचकी उत्पन्न करणें, धनंजय=सर्व शरीरास व्यापून राहणें ( शरीर फुगविणें ).

**भक्त**-४ प्रकारचे-आर्त=पीडित, भगवत्प्राप्तीची इच्छा करणारा, अर्थार्थी=धनप्राप्तीची इच्छा करणारा, जिज्ञासु=ज्ञानप्राप्तीची इच्छा करणारा, ज्ञानी=ज्ञान प्राप्त झालेला.

**भक्ति**-९-श्रवण, कीर्तन, नामस्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन.

**भाव**-८-अष्टसात्त्विक-स्तंभ, स्वेद, रोमांच, स्वरभंग, कंप, वैवर्ण्य, अश्रुपात, प्रलय.

**भुवनें**-१४-पाताल, महातल, तलातल, रसातल, सुतल, वितल, अतल, भूः, भुवः, सुवः, महः, जनः, तपः, सत्यं.

**भूतें**-**पंचमहाभूतें**-पृथ्वी, अप्, तेज, वायु व आकाश.

**मनु**-१४-स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि, इंद्रसावर्णि, धर्मसावर्णि.

**यमनियम**-**यम**-

शरीरसाधनापेक्षं नित्यं यत्कर्म तद्यमः ॥
आनृशंस्यं दया सत्यमहिंसा क्षांतिरार्जवम्।
प्रीतिः प्रसादो माधुर्यं मार्दवं च यमा दशः

**नियम**-

शौच्यमिज्या तपो दानं स्वाध्यायोपस्थनिग्रहः।
व्रतमौनोपवासं च स्नानं च नियमा दशः ॥

**योनि**-४-जारज=मनुष्य, अंडज=पक्षी, स्वेदज=उवा, लिखा वगैरे, उद्भिज्ज=वृक्ष.

**रस**-**अलंकारांतील** ९-शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत व शांत.

**रुद्र**-११-मृगव्याध, सर्प, निर्ऋति अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, दहन, ईश्वर, कपाली, महाद्युति आणि भर्ग.

**लोकपाल**-८-शक्र नांवाचा आदित्य, अनल नांवाचा वसु, सूर्यपुत्र यम, निर्ऋति नांवाचा रुद्र, वरुण नांवाचा आदित्य, अनिल नांवाचा वसु, वैश्रवण नांवाचा कुबेर, आणि ईश्वर नांवाचा रुद्र.

**वसु**-धर, ध्रुव, सोम, अन्ह, अनिल, अनल, प्रत्यूष आणि प्रभास.

**वाणी**-४-परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी.

**विकार**-२०-बुद्धि, ज्ञान, असंमोह, क्षमा, सत्य, दम, शम, सुख, दुःख, उत्पत्ति, विनाश, भय, अभय, अहिंसा, समता, संतोष, तप, दान, यश व अपयश.

| | व्यष्टी. | समष्टी. |
|---|---|---|
| **व्यष्टी-समष्टी**- | विश्व = जागृति | विराट्. |
| | तैजस = स्वप्नावस्था | हिरण्यगर्भ. |
| | प्राज्ञ = सुषुप्ति | ईश्वर. |

**शब्द**-घोष, ध्वनि, नाद व ॐकार.

**सिद्धि**-८-अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्या, इशिता व वशिता. (विशेष स्पष्टीकरणार्थ भागवत एकादशस्कंध अ. १५ पहा.)

**स्वर**-**गायनांतील**-निषाद, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत व पंचम.

# ऐतिहासिक दृष्टांतांतील कथाभाग.

## कीं टिटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं॥

(अ० १ ओ० ६८)

पूर्वीं एके काळीं समुद्राच्या कांठीं एक टिटवी रहात होती. तिनें आपलें घरटें इतर पक्ष्यांप्रमाणें झाडावर न करितां आपल्या जातिस्वभावाप्रमाणें जमिनींतच केलें होतें. कारण हे पक्षी कधींही झाडावर घरटीं करीत नाहींत. असो; याप्रमाणें ती तेथें सुखानें वास्तव्य करीत असतां, कांहीं कालानें तिला पिलें झालीं. तीं त्या घरट्यांतच होतीं. पुढें एके दिवशीं समुद्राचें पाणी वाढून तिचें तें घरटें वाहून गेलें; आणि त्याबरोबर तिचीं पिलेंही वाहून गेलीं. तेव्हां ती अत्यंत शोक करूं लागली; आणि त्या शोकावेगांत तिला भान न राहून, समुद्र कोरडा करावा या विचारानें तिनें चोंचीनें समुद्रांतील पाणी उपसून टाकण्याचा निश्चय करून तसें करण्यास आरंभ केला! तिचें हें वर्तन पाहून भगवान नारद ऋषींस तिची कींव आली; आणि त्यांनीं तिला सांगितलें कीं, मी तुझ्या दुःखाचा परिहार करण्याचा प्रयत्न करितों. याप्रमाणें सांगून त्यांनीं हें वर्तमान पक्षिराज गरुडास कळविलें; आणि त्याजकडून भगवान महाविष्णूकडे संधान बांधून समुद्राकरवीं त्या टिटवीचीं पिलें परत देवविलीं! हा दृष्टांत देण्यांत महाराजांचा हाच हेतु आहे कीं, अगाध समुद्रांत पडलेलीं पिलें परत मिळणें अशक्य असतांही ज्याप्रमाणें अनन्य प्रयत्न केल्यामुळें भगवान नारद ऋषींच्या कृपेनें तीं तिला परत मिळालीं, त्याप्रमाणें, मी नेणता जरी हा गीतार्थ कवळूं पहात आहें, तरी सद्गुरुप्रसादानें ही गोष्टही तडीस जाणें कांहीं अशक्य नाहीं!

## निवातकवचांचा ठावो फेडिला ॥

(अ० १ ओंवी २००)

पांडव वनवासांत असतां, प्रतिज्ञेप्रमाणें वनवासाचीं बारा आणि अज्ञातवासाचें एक अशीं तेरा वर्षें पूर्ण झाल्यावर, कौरवांशीं पुढें होणाऱ्या भयंकर युद्धांत भीष्म, द्रोण, कर्ण इत्यादि महावीरांचा पराभव करतां यावा म्हणून दिव्य शस्त्रास्त्रें संपादन करण्याकरितां अर्जुन सर्वांनुमतें स्वर्लोकीं जाण्यास निघाला. प्रथम तो हिमालय पर्वताच्या इंद्रकील नामक शिखरावर आला. तेथें त्यानें आपल्या तपानें आणि युद्धकौशल्यानें श्रीशंकरास संतुष्ट करून त्यांपासून पाशुपतास्त्र मिळविलें. याप्रमाणें अर्जुनावर प्रत्यक्ष भगवान शंकरांनीं अनुग्रह केलेला पाहून इतर देवांनींही अर्जुनास दिव्य शस्त्रास्त्रें दिलीं. याप्रमाणें अर्जुन सर्व शस्त्रास्त्रांनीं संपन्न झाल्यानंतर देवराज इंद्र एके दिवशीं त्यास म्हणाला, "अर्जुना, तुझें अध्ययन पूर्ण झालेलें असून आतां तुला अंगोपांगांसह सर्व अस्त्रें अवगत आहेत; तेव्हां आतां, तूं जी विद्या संपादन केली आहेस, तत्प्रीत्यर्थ गुरुदक्षिणा देण्याचा हा समय प्राप्त झाला आहे." अर्जुनानें उत्तर केलें, "आपण काय पाहिजे ती आज्ञा करा; ती मान्य करण्यास मी सिद्ध आहें." अर्जुनाचें हें भाषण ऐकून इंद्र म्हणाला, "निवातकवच नांवाचे दैत्य माझे अतिशय वैरी आहेत, आणि ते मला अजिंक्य आहेत. तेव्हां त्यांचा तूं वध केलास म्हणजे मला गुरुदक्षिणा दिल्यासारखें होईल; आणि एवढ्याचकरितां तुला हीं दिव्य शस्त्रास्त्रें आम्हीं दिलीं आहेत." याप्रमाणें देवराजाची आज्ञा होतांच अर्जुन इंद्राच्या रथांत बसला, आणि निवातकवच दैत्यांवर चालून गेला. तेथें त्यानें त्यांच्याशीं नानाप्रकारें युद्ध करून त्यांचा वध केला, आणि अशा प्रकारें त्यांचा मागमूसही नाहींसा करून इंद्रास सुखी केलें.

(भा. वन. अ. १६८–१७२.)

## तरी काय मी भस्मासुर ।

(अ. २ ओं. ३८)

कैलासीं असतां महेश । प्रदोषकाळीं एकदां ॥ ४ ॥ भस्म स्वकरीं घेऊन । आंगीं चर्ची उमारमण । तंव एक खडा लागला तो शिवें जाण । भूमीवर ठेविला

॥५॥ नवल शिवाचें चरित्र । तेथेंचि उत्पन्न झाला असुर । नाम ठेविलें भस्मासुर । उमा सदा कर जोडुनी ॥६॥ म्हणे वृषभध्वजा सदाशिवा । मज कांहीं सांगिजे सेवा । शंभु म्हणे मज नित्य येधवां । चिताभस्म आणोनि देईंजे ॥७॥ नित्य नूतन आणीं भस्म । हींच सेवा करीं उत्तम । ऐसी आज्ञा होतां परम । भस्मासुर संतोषला ॥८॥ कर्मभूमीस, नित्य येवोन । वसुंधरा शोधी संपूर्ण । जो शिवभक्त परायण । लिंगार्चन घडलें ज्यासी ॥९॥ शिवरात्री सोमवार प्रदोष । सदा ऐके शिवकीर्तन सुरस । त्याचेंच भस्म भवानीश । अंगिकारी आदरें ॥ ११० ॥ ऐसें नित्य आणितां चिताभस्म । असुर मातला मदें परम । गोब्राह्मण देखे मनुष्य उत्तम । म्हणे संहारूनिया टाकूं हे ॥१२०॥ हे संहारूनियां सकळ । असुरराज्य करावें सबळ । जाऊनियां निर्जरमंडळ । शक्र कमलोद्भव जिंकावे ॥२१॥ विष्णु आणि धूर्जटी । हेही संहारावे शेवटीं । त्रिभुवन जिंकिल्या पाठीं । मीच इंद्र होईन ॥२२॥ ऐसी मनीं बांधोनि गांठी । कैलासा गेला तो कपटी । म्हणे ऐकतोसी धूर्जटी । भस्म सृष्टीं न मिळे कोठें ॥२३॥ चार लक्ष मनुष्य योनी पाहे । नित्य सवालक्ष घडामोड होय । शोधिली सर्व अवनी हे । परी भस्म शुद्ध न मिळेची ॥२४॥ ऐसी कपटभक्ती दावी परम । म्हणे माझा टळतो नित्यनेम । तुज अर्पावें चिताभस्म । तरी एक वर्म सुगम असे ॥२५॥ म्हणे हरा पंचवदना । विरूपाक्षा त्रिपुरच्छेदना । उमावल्लभा नागभूषणा । वरप्रदान दे मातें ॥२६॥ मज देई एक वर । ज्याच्या माथां ठेवीन कर । तो भस्म व्हावा निर्धार । कार्य फार साधे येणें ॥२७॥ म्हणोनि लोटांगण घालित । इतकें माझें चाकरीं वृत्त । निःकपट शिव भोळानाथ । वर द्यावया सिद्ध झाला ॥ २८ ॥ मग बोले हिमनगराजकुमारी । हा नष्ट परम दुराचारी । यासी वर देतां धरित्री । भस्म करील निर्धारें ॥ २९ ॥ महाशब्द करावयाची हौस । तों पातला फाल्गुन मास । आधींच वाटपाड्या चोरास । निरोप दिधला भूभुजें ॥१३०॥ आधींच जारकर्मी रत । त्यासी प्रभुत्व दिधलें स्त्रीराज्यांत । कीं मद्यपीयासी दाविलें । सिंदीवन साक्षेपें ॥३१॥ मर्कटासी मद्यपान । त्यांत झालें वृश्चिकदंशन । त्याहीवरी भूत संचरलें दारुण । मग अन्योन्य वर्ते जेविं ॥३२॥ यालागीं हा तामसी असुर । यास न द्यावा कदापि वर । षडास्य गजास्य वीरभद्र । नंदिकेश्वर होंचि सांगे ॥३३॥ परम भोळा शंकर । म्हणे आमुचें लेंकरूं भस्मासुर । यास द्यावा अगत्य वर । तो अन्यत्र रहाटी न करीच॥३४॥ म्हणे बाळका तुज दिधला वर । ऐसें ऐकतांचि असुर । उडे नाचे आनंद थोर । त्रिभुवनामाजीं न समाये ॥ ३५ ॥ मृत्युलोकासी आला सत्वर । मग करीत चालला संहार । संत भक्त गोविप्र । शोधूनि भस्म करीतसे ॥ ३६ ॥ मस्तकीं हस्त ठेवितां तात्काळ । भस्म होय नलगे वेळ । ऋषिचक्र शोधूनि सकळ । भस्म करी एकदाची ॥ ३७ ॥ छपन्न देश शोधित । चमूसहित भूभुज समस्त । भस्म करी क्षणांत । थोर अनर्थ वोढवला ॥ ३८ ॥ कुटुंबासहित ब्राह्मण । गिरिविवरीं बैसती लपोन । पृथ्वी उद्वस संपूर्ण । बाहेर कोणी न फिरेची ॥ ३९ ॥ जैसा श्येन पक्षी अकस्मात । पक्षी धरोनि संहारित । तैसा अंतरिक्ष येवोनि त्वरित । मस्तकीं हस्त स्पर्श करी॥१४०॥ महायोद्धा रणपंडित । समरीं जिंकी कृतांत । परी भस्मासुरापुढें बलहत । कांहींच न चले युक्ती त्या ॥४१॥ जैसा पाखांडी खळ तत्वतां । तो नावरे बहुतां पंडितां । तैसा त्या असुरापुढें पाहतां । न चले युक्ती कवणाची ॥ ४२॥ असुर करितो नित्य संहार । शिवासी न कळे समाचार । भस्म नेऊनि दे सत्वर । महानम्र होय तेथें ॥ ४३ ॥ सर्वांचि मृत्युलोका । मनीं धरिला ऐसा आवांका । त्रिदशांसहित शचीनायका । भस्म करावें यावरी ॥ ४४ ॥ मग कमलोद्भव कमलावर । शेवटीं भस्म करावा गंगाधर । उमा त्रिभुवनांत सुंदर । हिरोनि घ्यावी बुद्धाची ॥४५॥ पृथ्वी पडली उद्वस । मिळाल्या प्रजा ऋषी आसमास । सर्वांचें भय पावलें मानस । पुरुहुतास शरण आले॥४६॥ मग मघवा सकळांसहित । पद्मजाप्रती गान्हाणें सांगत । तो म्हणे क्षीराब्धिजामात । त्यास सांगूं चला आतां ॥ ४७ ॥ अक्षजनाम इंद्रियज्ञान । तें ज्यानें केलें आधीं दमन । म्हणोनि अधोक्षज नाम त्यालागून । अतींद्रिय द्रष्टा तो ॥ ४८ ॥ ऐसा जो अधोक्षज । जवळी केला वैकुंठराज । गान्हाणें सांगती प्रजा द्विज । भस्मासुराचें समस्त ॥ ४९ ॥ मग समस्तांसहित नारायण । शिवाजवळी सांगे वर्तमान । भस्मासुरें जाळून । भस्म केलें सर्वही ॥ १५० ॥

उरलों आम्ही समस्त । इतुक्याचाही करील अंत । सदाशिवा तुझाही प्रांत । बरा न दिसे आम्हांतें ॥ ५१ ॥ हैमवती करीं जतन । ऐकोनि हांसला भाललोचन । म्हणे भस्मासुरास मरण । जवळी आलें यावरी ॥ ५२ ॥ तुम्हीं जावें स्वस्थाना सत्वर । ऐसें बोले जों कर्पूर-गौर । तों अकस्मात आला असुर । भस्म घेऊन तेधवां ॥ ५३ ॥ आपुलें गान्हाणें आणिलें येथ । मि-ळाले ते देखिले समस्त । असुर मान तुकावित । सर-ड्याऐसी तयांवरी ॥ ५४ ॥ म्हणे जे जे आले येथ । त्यां भस्म करीन समस्त । मग क्रोधें बोले उमानाथ । भस्मासुरासी तेधवां ॥ ५५ ॥ अरे तूं अधम असुर । केला पृथ्वीचा संहार । तुज आम्हीं दीधला वर । परिणाम त्याचा बरा केला ॥ ५६ ॥ असुर क्रोधें बोले ते समयीं । तुझी सुंदर दारा मज देईं । नातरी तव मस्तकीं लवलाहीं । हस्त आतांचि ठेवितों ॥ ५७ ॥ भवानी उठोन गेली सदनांत । असुर ग्रीवा तुका-वित । शिवाच्या माथां ठेवोनि हस्त । तुज नेईन क्षणार्धें ॥५८॥ शिवमस्तकीं ठेवावया कर । वेगी धाविन्नला भस्मासुर । प्रजा आणि ऋषीश्वर । पळूं लागले दशदिशा ॥५९॥ जो भक्तजनभवभंग । माया-लाघवी उमारंग । पळता झाला सवेग । घोरांदर वन घेतलें ॥१६०॥ पाठीं लागला भस्मासुर । म्हणे जो-गड्या उभा धरीं धीर । आजि तुझा करीन संहार । रक्षा लावीन आंगासी ॥६१॥ वेदशास्त्रां न कळे पार । मायाचक्रचालक अगोचर । त्यास पामर भस्मासुर । धरीन म्हणे निजबळें ॥६२॥ जो ब्रह्मादिक देवांचें ध्यान । सनकादिकांचें देवतार्चन । त्यास भस्मासुर आपण । धरीन म्हणे पुरुषार्थें ॥ ६३ ॥ त्यास वाटे धरीन मी आतां । दिसे जवळी परी नाटोपे सर्वथा । ऐसा कोटि वर्षें धांवतां । नळगे हाता सर्वेश्वर ॥ ६४ ॥ उणे पुरे शब्द बोलत । शब्दा नातुडे गिरिजाकांत । तर्क कुतर्क करितां बहुत । हाक फोडितां नातुडे ॥६५॥ वेदशास्त्रांचा तर्क चांचरे । घोकितां शास्त्रज्ञ झाले म्हातारे । सकळ कळा विद्या घेतां एकसरें । मदनांतक नाटोपे ॥६६॥ जे प्रेमळ शुद्ध भाविक । त्यांचा विकला कैलासनायक । उमासहित त्यांचे घरीं देख । वास करी सर्वदां ॥ ६७ ॥ तप बळ विद्या धन । या बळें धरूं म्हणती ते मूर्ख पूर्ण । कल्पकोटी जन्ममरण ।

फिरतां गणित न होय ॥ ६८ ॥ असो अहंकारें भस्मा-सुर । धांवतां नाटोपे शंकर । इकडे भवानी इंदिरावर । बंधु आपुला स्तवी तेव्हां ॥ ६९ ॥ म्हणे कमलोद्भव-जनका कमलनयना । कमलनाभा मुरमर्दना । कमलधारका कमलशयना । कमलाभरणा कमला-प्रिया ॥ १७० ॥ जगद्वंद्या जगव्यापका । जनजराजन्ममोचका । जनार्दना जगरक्षका । जग-दोद्धारा जळाब्धिशयना ॥ ७१ ॥ ऐसें ऐकतां माधव । मोहिनीरूप धरूनि अभिनव । शिवमनरंजन केशव । आडवा आला असुरातें ॥ ७२ ॥ शिवन्यग्रोध होऊनि देख । दुरून पाहता झाला कौतुक । मोहिनी देखतां असुर निःशंक । भुलोनि गेला तेधवां ॥ ७३ ॥ वि-मानीं पाहती समस्त देव । म्हणती हें कैंचें रूप अभि-नव । अष्टनायिकांचें वैभव । चरणांगुष्टीं न तुळेचीं ॥७४॥ नृत्य करीत मोहिनी । असुर तन्मय झाला देखोनि । म्हणे ललने तुजवरूनी । कमळा अपर्णा ओंवाळिजे ७५ तुझें देखतां वदन । वाटे ओंवाळूनि सांडावा प्राण । तुवां नयनकटाक्षबाणेंकरून । मनमृग माझा विंधि-ला ॥ ७६ ॥ तुझें पदकमळ जेथें उमटलें । तेथें सुवास घ्यावया वसंत लोळे । तुवां पस-रोनि श्रृंगारजाळें । आकळिलें चित्तमीना ॥ ७७ ॥ मज माळ घालीं सत्वर । तुझें दास्य करीन निरंतर । मायावेषधारी मुरहर । हास्यवदनें बोलतसे ॥ ७८ ॥ म्हणे मी तुज वरीन त्वरित । पैल तो न्यग्रोध तरु दिसत । माझें त्यांत आहे आराध्य दैवत । नवस तेथें केला म्यां ॥७९॥ लग्नाआधीं पतीसहित । तेथें करावें गायन नृत्य । परी मी जेथें ठेवीन हस्त । तुवां तेथेंच ठेवावा ॥ १८० ॥ मी जे दावीन हावभाव । तूंही तैसेच दावीं सर्व । तेथ अणुमात्र उणें पडतां देव । क्षोभेल मग तुजवरी ॥ ८१ ॥ महा खडतर माझें दैवत । सकळ ब्रह्मांड जाळील क्ष-णांत । असुर तियेसी अवश्य म्हणत । सांगसी तैसा वर्तेन मी ॥८२॥ ऐसा भुलवून तयासी । आणिला तो वटच्छायेसी । मग नमूनि देवतासी । आरंभी नृत्य मोहिनी ॥ ८३ ॥ मोहिनी नृत्य करित । अष्टनायिका तटस्थ पहात । किन्नर गंधर्व तेथें । गायन ऐकतां भुलले ८४ देव सर्व षट्पद होउनी । सुवासा तिच्या वेधुनी । गुप्तरूपें गुंजारव करिती वनीं । परी ते कामिनी कोणा

नेणवे ॥ ८५ ॥ तिचें सुस्वर ऐकतां गायन । विधिकुरंग गेला भुलोन । कुंभीनी सोडून करावया श्रवण । कद्रुतनय येऊं पाहे ॥८६॥ मोहिनी जेथें ठेवी हस्त । असुरही तैसेंचि करित । आपुले मस्तकीं ठेवित आरमकर मोहिनी ॥ ८७ ॥ मग असुरेंही आपुले शिरीं हात । ठेवितां भस्म झाला तेथ । मोहिनीरूप त्यागोनि भगवंत । चतुर्भुज जाहला ॥८८॥ वटरूप सांडोनि देख । प्रगट झाला तेथें मदनांतक । हरिहर भेटले झाले एक । देव वर्षती सुमनमाळा ॥ ८९ ॥

## मृत गुरुपुत्र आणिला ।

( अ. ३ ओंवी १६३. )

भगवान श्रीकृष्ण आणि बलराम ह्यांनीं गोकुलांत अनेक बाललीला करून, पुष्कळ दुष्ट राक्षसांचा संहार केला; आणि त्या योगें थोडासा भूभार उतरिला. पुढें, धनुर्यागाचें मिष करून त्यांचा वध करण्याकरितां कंसानें त्यांना अक्रूराकरवीं मथुरेस बोलावून आणिलें. तेथें त्यांचा नाश करण्याकरितां त्यानें आपल्याकडून कडेकोट बंदोबस्त केला होता; परंतु सर्वच परिणाम विपरीत होऊन स्वतः कंसाला श्रीकृष्णाच्या हातून मुक्ति मिळाली । नंतर राम-कृष्णांचें उपनयन झाल्यावर ते अवंति नगरांत सांदीपनि नामक ब्राह्मणाजवळ अध्ययन करण्यास राहिले. तेथें त्यांचें अध्ययन पूर्ण झाल्यावर अपेक्षित गुरुदक्षिणा मागावी म्हणून सांदीपनीची त्यांनीं प्रार्थना केली. सांदिपनि ब्राह्मणानें त्या रामकृष्णांचा अद्भुत महिमा व अमानुष बुद्धि मनांत आणिली, आपल्या पत्नीची सल्ला घेतली, आणि प्रभासक्षेत्रीं समुद्रामध्यें बुडालेल्या पुत्रास आणून यावें ही रामकृष्णांपाशीं गुरुदक्षिणा मागितली ! नंतर ते अतुलपराक्रमी रामकृष्ण 'बरें आहे' असें म्हणून रथारूढ झाले, व प्रभासक्षेत्रीं जाऊन समुद्राच्या कांठीं क्षणभर बसले. इतक्यांत, ते परमेश्वर आहेत, असें जाणून मनुष्यरूपानें समुद्र त्यांपुढें प्रकट झाला, व त्यानें अर्घ्यपाद्यादिकांनीं त्या जगद्गुरूंची पूजा केली। नंतर भगवान श्रीकृष्णानें समुद्रास म्हटलें कीं, "बा समुद्रा, तूं आपल्या मोठ्या लाटेसरसा आमचा गुरुपुत्र बुडविला आहेस, तो लवकर आणून दे." त्यावेळीं समुद्रानें उत्तर दिलें, 'हे प्रभो, तो गुरुपुत्र मीं कांहीं बुडविला नाहीं. माझ्या उदकांत शंखाचें रूप घेऊन राहणारा एक मोठा असुर आहे, त्यानें तो नेला आहे.' तेव्हां भगवान श्रीकृष्णानें लागलीच जलांत प्रवेश करून त्या असुराचा वध केला; व त्याचें उदर फोडून आंत पाहिलें, परंतु गुरुपुत्र त्यास आढळला नाहीं ! नंतर त्या असुराच्या देहापासून सिद्ध केलेला पांचजन्य नामक शंख घेऊन श्रीकृष्ण पुनः रथारूढ झाला, व बलरामासह यमाच्या संयमनी नामक नगरींत गेला. यमपुरीच्या समीप जातांच त्यानें पांचजन्याचा शब्द करून यमास सूचना दिली, तेव्हां सर्व प्रजेला दंड करणाऱ्या त्या यमानें मोठ्या लगबगीनें सामोरे येऊन भगवंतास भक्तिपुरःसर पूजा अर्पण केली. नंतर यमधर्मानें हात जोडून श्रीकृष्णास म्हटलें, "हे सर्वांतरसाक्षी भगवंता, तूं केवळ लीलेनें हें नररूप धारण करून ह्या ठिकाणीं प्राप्त झाला आहेस । वस्तुतः तूं अखिल जगाचा अधिपति आहेस । तुझी कोणती आज्ञा आहे ती सांग. "

भगवान श्रीकृष्ण म्हणालाः—यमा, तुझ्या दूतांनीं सांदीपनि गुरूचा पुत्र येथें आणिला आहे, त्यास माझ्या स्वाधीन कर. बाबारे, त्यास येथें आणण्यांत तुझी किंवा तुझ्या दूतांची कांहीं चूक झाली आहे असें नाहीं; केवळ तो आपल्या कर्मानुसार येथें आला आहे. परंतु आतां माझ्या आज्ञेवरून त्यास तूं सोड. माझ्या आज्ञेमुळें तुला तसें करण्यापासून कांहींएक दोष लागणार नाहीं. ही श्रीकृष्णाची आज्ञा श्रवण करून यमधर्मानें लागलाच गुरुपुत्र त्याच्या स्वाधीन केला; आणि नंतर ते रामकृष्ण त्या पुत्रासमवेत तात्काळ सांदीपनीकडे आले, व त्यांनीं तो पुत्र त्यास अर्पण केला.

भागवत, दशमस्कंध, अ. ४५.

---

१ अ० ११ ओं. १०५ मध्यें, 'अर्जुनी वैरियाचिया कलेवरा । विसंवसीना ॥' असा जो उल्लेख आहे, तो ह्या असुराच्या देहापासून सिद्ध केलेला जो पांचजन्य शंख श्रीकृष्णांच्या हातांत असे, त्याला उद्देशून आहे.

## ....श्रीशंभूची प्रसन्नता । तया उपमन्यूचिया आर्ता । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ॥

( अ. ५ ओंवी ११. )

उपमन्यु हा वसिष्ठकुळोत्पन्न व्याघ्रपाद नामक ऋषीच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ. धौम्य मुनीचा ज्येष्ठ भ्राता, हा बाळ असतां, आपल्या भ्रात्यासहवर्तमान प्रायः स्वगृहींच क्रीडा करीत असे. एकदां बंधूसहित दुसऱ्या एका ऋषीच्या आश्रमांतील मुलांसमागमें क्रीडा करीत असतां तेथें यानें धेनूस दोहन करितांना पाहिलें, व क्षीर अवलोकन करून, तेथील मुलांच्या मातेनें आपल्या मुलांस तें दिलें त्यांत यास व याच्या भ्रात्यासही दिलें. तें भक्षण केल्यावर हा स्वगृहीं आला, आणि मातेपाशीं तसेंच क्षीर मागूं लागला. तेव्हां याच्या मातेनें आपल्या नित्याच्या क्रमाप्रमाणें उदकांत पिष्ट कालवून यापुढें ठेविलें असतां, हें दुग्ध मला नको, तर, काल जसें मी अमुक आश्रमीं भक्षण केलें तसें दे, असें म्हणूं लागला. तें याचें भाषण ऐकून माता खिन्न होऊन यास बोलली कीं, तसें दूध मिळण्याजोगें तुमचें सुकृत नाहीं; कारण पूर्वजन्मीं तुम्हांस ईश्वराराधन घडलें नाहीं. त्यावरून त्यानें ईश्वराराधन करून आकल्प आयुष्य व क्षीरसागराचें आधिपत्य, अशीं संपादन केलीं. याची गणना शैवांत असून, कृष्णानेंही यापासून शैवी दीक्षा घेतली होती.

( भारतवर्षीय प्रा. ऐ. कोश. )

## ....वोढविली वक्षस्थलाची वाखती । चरणरजां ॥

( अ. ९ ओं. ४८० )

एकदा सरस्वती नदीचे कांठीं महान महान ऋषि सत्र करीत असतां ब्रह्मा, विष्णु व शंकर या त्रिवर्गापैकीं सत्वगुणप्रधान मूर्ति कोणती याबद्दल त्यांच्यामध्यें भवति न भवति झाली, परंतु कांहींच निर्णय होईना. तेव्हां ब्रह्मपुत्र भृगु ह्यास त्या सर्व ऋषींनीं परीक्षेकरितां या त्रिवर्गाकडे पाठविलें. भृगु प्रथमतः ब्रह्मलोकीं गेला. तेथें ह्याचा पिता जो ब्रह्मदेव त्यास नमस्कार न करितां त्याचे समोर उभा राहिला; त्या वेळीं, आपल्या पुत्रानें आपला अपमान केला याबद्दल ब्रह्मदेवास फार वाईट वाटलें; परंतु कांहीं वेळानें त्याचा राग शांत झाला व त्यानें भृगूला क्षमा केली. भृगु ऋषीनें ब्रह्मदेवाच्या गुणाची परीक्षा करून कैलासास शंकराची भेट घेण्यासाठीं गमन केलें. तेथें जातांच भृगु ऋषीस भेटण्यास शंकर त्याला सामोरे आले; तेव्हां भृगु म्हणाला कीं, "शंकरा, तूं स्मशानांत वास करणारा, गळ्यांत नरमुंडमाळा व सर्प धारण करणारा, सर्वांगास चिताभस्म लेपन करणारा असा अमंगल आहेस, तरं तूं मला स्पर्श करूं नको." असें भृगूचें भाषण ऐकून शंकरांस फारच राग येऊन त्याचे डोळे आरक्त झाले, व क्रोधानें आपला त्रिशूळ हातांत घेऊन ते भृगु ऋषीस मारण्याकरितां त्याचे अंगावर धांवले, परंतु पार्वतीनें त्यांचें सांत्वन करून मागें परतविलें. नंतर भृगु ऋषि विष्णुलोकीं गेले. तेथें विष्णु लक्ष्मीचे मांडीवर शयन करीत आहेत असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. मग त्या मुनिश्रेष्ठांनीं विष्णूचे वक्षस्थलावर जोरानें लाथ मारिली, तेव्हां श्रीविष्णु भगवान जागे होऊन पाहतात तों अग्रभागीं भृगु ऋषि आहेत । हें पाहतांच ते मंचकावरून उठले आणि म्हणाले, "ब्रह्मन्, आपला मजकडून फार अपमान झाला म्हणून मला क्षमा असावी" असें बोलून त्यांनीं त्या मुनींची सेवा करण्यास सुरवात केली; तेव्हां भृगु ऋषींनीं, विष्णूस आपण लाथ मारली याबद्दल बिलकूल राग न येतां तो माझी सेवा मनोभावें करीत आहे, तर सत्त्वगुण याचे ठायीं श्रेष्ठ आहे, अशी परीक्षा केली.

( भागवत दशमस्कंध अ. ८९. )

## वैकुंठपीठनायकें । रुसला ध्रुव कवतिकें । बुझाविला देऊनि भातुकें । ध्रुवपदाचें ॥

( अ. १० ओं. १८. )

ध्रुव हा सूर्यवंशीय उत्तानपाद राजाच्या पट्टराणीचा पण नावडतीचा पुत्र, एकदा, पित्याच्या मांडीवर बसावें या हेतूनें आला असतां त्या राजानें आपल्या पुत्रास मांडीवर बसूं दिलें नाहीं. हें पाहून त्याची आवडती बायको त्या मुलास नवऱ्यासमक्ष पुष्कळ दुरुत्तें बोलली आणि म्हणाली, "बाळा, तूं राजांकावर बसण्यास योग्य नाहींस. जर तूं

मांडीवर बसण्याचें इच्छीत असशील, तर घोर अरण्यांत जाऊन ईश्वराची प्रार्थना कर, आणि माझ्या उदरीं जन्म घेण्याचें मागून घे, म्हणजे तुला मांडीवर बसावयास मिळेल." हें सापत्न मातेचें भाषण एकून तो मुलगा रडत रडत आपल्या आईकडे गेला, आणि त्यानें झालेली सर्व हकीकत तिला सांगितली. तेव्हां तिलाही फार वाईट वाटलें व ती म्हणाली, "बाळा, तुझ्या सापत्न मातेनें सांगितल्याप्रमाणें तूं ईश्वरप्राप्ति करून घे, म्हणजे सुखी होशील."

नंतर ध्रुवानें आपल्या मातेस साष्टांग नमस्कार करून तो वनांत निघून गेला. तो अरण्यांत कांहीं अंतरावर गेल्यावर त्याची व नारदाची भेट झाली. त्यानें नारद ऋषींस परमेश्वरप्राप्ति कशी व कोठें जाऊन तपश्चर्या केली असता होईल म्हणून विचारलें; नारदांनीं त्या मुलाचें वय लहान असून अशा अवस्थेंत इतका विरक्त कां झाला याचें कारण त्यास विचारलें, त्यावरून त्या मुलानें घरीं घडलेली सर्व हकीगत नारदांस सांगितली. तेव्हां नारद त्या मुलास म्हणाले, "मुला, अशा अज्ञान स्थितींत तुला ईश्वरप्राप्ति होणें कठीण, तरी तूं मानापमानाचा विचार न करितां घरीं सुखानें जा." त्या वेळीं ध्रुव म्हणाला, "हे मुने, आपण सांगतां ही गोष्ट खरी; परंतु ईश्वराची प्राप्ति झाल्यावांचून मागें परत जाणें मला बरें वाटत नाहीं, तरी मला आपला उपदेश पाहिजे." नारदांनीं त्या मुलाचा ईश्वरप्राप्ति करून घेण्याचा पक्का निश्चय जाणून त्यास **ॐ नमो भगवते वासुदेवाय** हा मंत्र शिकवून, मधुवनांत जाऊन ईश्वराची निस्सीम आराधना कर असें सांगितलें. त्याप्रमाणें ध्रुवानें मधुवनांत जाऊन अन्न ग्रहण न करितां आत्मा ब्रह्मांडीं नेऊन ईश्वराची आराधना चालविली. ध्रुवाची ही कडकडीत आराधना पाहून आपलें पद हा हिसकावून घेईल या भीतीनें सर्व देव भगवान श्रीविष्णूला शरण गेले. तेव्हां भगवंतांनीं, हा माझा पूर्ण भक्त आहे, त्याला मी मधुवनांत जाऊन दर्शन देतों व तुमचें दुःख निवारण करतों, असें सांगितलें. नंतर, ध्रुव दोन्ही डोळे झांकून श्रीविष्णूची मूर्ति ध्यानांत आणून स्तवन करीत होता, इतक्यांत श्रीविष्णूंनीं तेथें येऊन त्याच्या ध्यानांतील आपलें रूप एकदम नाहींसें केलें. म्हणून त्यानें डोळे उघडून पाहिलें, तों आपण ज्या मूर्तीचें रूप मनांत आणिलें होतें ती साक्षात् आपलेपुढें उभी आहे असें त्याला दिसलें. ती मूर्ति पाहतांच तो ईश्वरचरणीं गडबडां लोळूं लागला व अज्ञान असल्यामुळें स्तुति कशी करावी हें त्यास सुचेना. तेव्हां ईश्वरानें आपला शंख त्याचे गालास लावतांच त्याला पूर्ण ज्ञान झालें, व तो एकदम त्याची स्तुति करूं लागला. तेव्हां परमेश्वरांनीं प्रसन्न होऊन त्यास सांगितलें कीं, आजपर्यंत जें मीं कोणास दिलें नाहीं तें मी तुला देतों; परंतु तूं आतां आपले घरीं जा, आणि तुझा पिता तुला राज्यावर बसवून तपास जाईल तें तूं छत्तीस हजार वर्षें कर." असें म्हणून ते अंतर्धान पावले. ध्रुव नंतर घराकडे परतला, परंतु त्यास थोडासा पश्चात्ताप झाला, तो कां म्हणाल तर, ईश्वरप्रार्थना करून मुक्ति मिळवून घ्यावयाची तें कांहीं वेळेवर सुचलें नाहीं म्हणून त्यास वाईट वाटलें. तो जेव्हां रानांत निघून गेला, तेव्हां ती बातमी नारदांनीं त्याचे पित्यास सांगितली. त्या वेळीं उत्तानपाद राजास आपल्या कृतकर्मांचा व आपल्या समक्ष आपल्या बायकोनें ध्रुवाचा उपमर्द केला याबद्दल फार पश्चात्ताप झाला. पुढें, आपला मुलगा पुनः घरीं येत आहे अशी कोणी बातमी दिली ती राजास खोटी वाटली. परंतु मुलगा पाहिल्यावर त्या सर्वांस फार आनंद झाला, व राजानें ध्रुवास राज्याभिषेक करून आपण वनांत तपश्चर्येकरितां निघून गेला, पुढें ध्रुवानेंही भगवंताच्या आज्ञेप्रमाणें राज्य करून अढळपदीं गमन केलें. तो ध्रुवाचा तारा अद्याप आकाशांत दृष्टीस पडतो.

( भाग. चतु. अ. ८–१२ )

## एकाचे गर्भवासही साहिले।

( अ. ११ ओं. ३५ ).

सांगेन साक्ष आतां तुज॥ अंबरीष म्हणिजे द्विज॥ एकादशी व्रताचिये काज ॥ विष्णूसी अवतार करविले ॥ ५५ ॥ अवतार व्हावया कारण ॥ सांगेन तुजला विस्तारून ॥ मन करोनि सावधान ॥ एकचित्तें परिसेसा ॥ ५६ ॥ द्विज करी एकादशी व्रत ॥ पूजा करी अभ्यागत ॥ निश्चयो करी दृढ चित्त ॥ हरिचिंतन सार्वकाळ ॥ ५७ ॥ असो त्याचिया व्रतासी ॥ भंग करावया आला ऋषी ॥ अतिथी होऊनी द्वेषीं ॥

पावला मुनी दुर्वास ॥ ५८ ॥ ते दिवशीं साधनद्वादशी घडी एक ॥ आला अतिथी कारणिक ॥ अंबरीषास पडला धाक ॥ केवीं घडे म्हणोनियां ॥ ५९ ॥ ऋषी आले देखोनी ॥ अंबरीषानें अभिवंदोनी ॥ अर्घ्यपाद्य देवोनी ॥ पूजा केली उपचारें ॥ ६० ॥ विनवीतसे ऋषेश्वरासी ॥ शीघ्र जावें स्नानासी ॥ साधन आहे घटिका द्वादशी ॥ यावें अनुष्टान सारोनियां ॥ ६१ ॥ ऋषी जाऊनी नदीसी ॥ अनुष्टान करिती विधीसी ॥ विलंब लागतां तयासी ॥ आली साधनघटिका ॥ ६२ ॥ व्रतभंग होईल म्हणोनी ॥ पारणें केलें तीर्थ घेउनी ॥ नानाप्रकार पक्वान्नीं ॥ पाक केला ऋषीतें ॥ ६३ ॥ तंव आले दुर्वास देखा ॥ पाहुनी अंबरीषाच्या मुखा ॥ म्हणे भोजन केलेंसि कां ॥ अतिथिहीण दुरात्मया ॥ ६४ ॥ शाप देतां ऋषेश्वर ॥ द्विजें स्मरला शार्ङ्गधर ॥ करावया भक्ताचा कैवार ॥ टाकून आला वैकुंठा ॥ ६५ ॥ भक्तवत्सल नारायण ॥ शरणागताचें रक्षण ॥ बिरुद बोलती पुराणें जाण ॥ धांवे धेनु वत्सासि जैसी ॥ ६६ ॥ शापिलें ऋषीनें द्विजासी ॥ जन्मावें गा अखिल योनींसी ॥ तंव पावला हृषीकेशी ॥ येउनी जवळी उभा ठेला ॥ ६७ ॥ मिथ्या नव्हे ऋषींचें वचन ॥ द्विजें धरिले श्रीविष्णूचे चरण ॥ भक्तवत्सल ब्रीद जाण ॥ तया महाविष्णूचें ॥ ६८ ॥ विष्णु म्हणे दुर्वासासी ॥ तुवां शापिलें अंबरीषासी ॥ स्वाधीन आपुल्या दासासी ॥ शाप आम्हांसी तुम्हीं द्यावा ॥ ६९ ॥ दुर्वास ज्ञानी ऋषेश्वर ॥ केवळ ईश्वरअवतार ॥ फेडावया भूमिभार ॥ कारण असे पुढें म्हणतसे ॥ ७० ॥ जाणोनि ज्ञानीशिरोमणी ॥ म्हणे तप करितां युगें क्षोणीं ॥ भेटी नव्हे हरीचरणीं ॥ भूमीवरी दुर्लभ ॥ ७१ ॥ शापसंबंधें अवतरोनी ॥ येईल लक्ष्मी घेऊनी ॥ तारावयालागोनी ॥ भक्तजनां समस्तां ॥ ७२ ॥ परोपकारसंबंधेंसी ॥ शाप द्यावा विष्णूसी ॥ भूमिभार फेडावयासी ॥ कारण असे म्हणोनियां ॥ ७३ ॥ ऐसें विचारोनी मानसीं ॥ दुर्वास म्हणे विष्णूसी ॥ अवतरोनी भूमीसी ॥ नानास्थानीं जन्मावें ॥ ७३ ॥ प्रसिद्ध होसी वेळ दहा ॥ उपर अवतार पूर्ण पहा ॥ सहज तूं विश्वात्मा महा ॥ स्थूळसूक्ष्मीं वससी तूं ॥ ७५ ॥ ऐसा कार्यकारण शाप ॥ अंगीकारी जगाचा बाप ॥ दुष्टावरी असे कोप ॥ सृष्टिप्रतिपाळ करावया ॥ ७६ ॥ ऐसे दाहा अवतार झाले ॥......

## अपराधिया शिशुपाळा ! आपणपें ठावो दिधला ॥

( ज. ११ ओं. १०२. )

धर्मराजानें इंद्रप्रस्थीं राजसूय यज्ञ आरंभिला असतां, त्या ठिकाणीं देशोदेशीचे राजे जमले होते, त्यांत शिशुपालही होता. त्या वेळीं, अग्रपूजा कोणास द्यावी, याविषयीं वादविवाद होऊन भीष्मांनुमतें कृष्णास द्यावी असें ठरलें, म्हणून धर्मराजा कृष्णाची पूजा करूं लागला. हें शिशुपालास सहन न होऊन तो भीष्माची व कृष्णाची निंदा करूं लागला; त्याचें कोणी ऐकेना. परंतु हें पाहून तो उभा राहून म्हणाला, "येथें देवर्षि, राजर्षि, ब्रह्मर्षि असे मोठमोठे असतां या गोपपुत्राची पूजा येथें होत आहे हें ठीक नव्हे," इतकें बोलून तो भीष्मास अनेक दुर्वाक्यें बोलूं लागला व शेवटीं हें प्रकरण हातघाईवर आलें. तेव्हां भीमास अनिवार राग येऊन तो शिशुपालावर धावला असतां त्यास भीष्मांनीं अडथळा केला; व भीमास शिशुपालाची मूळकथा सांगितली, म्हणून भीम खालीं बसला.

तेव्हां शिशुपाल म्हणाला:--" भीष्मा, भीमास कां बसविलें त्याला मजबरोबर युद्ध करूं दे ! मी त्याचा आतां पराभव करून त्याला ठार मारून टाकतों !" असें बोलून तो आणखी भीष्मास म्हणाला, "मूर्खा, या ठिकाणीं मोठमोठे ब्रह्मर्षि वगैरे असतां या गवळ्याच्या पोराची पूजा आरंभिली आहे हें मला बरोबर दिसत नाहीं. जो याची पूजा करील, त्याचा मी वध करीन; व जे कोणी मजबरोबर युद्ध करण्यास येतील त्यांचाही वध करीन आणि कृष्णाचाही वध करण्यास मागेंपुढें पहाणार नाहीं. शिशुपालाचें शेवटचें वाक्य संपल्यावर कृष्ण मृदु व शांत वाणीनें म्हणाले, "अहो, हा माझ्या पितृभगिनीचा मुलगा आहे. यानें माझे पुष्कळ अन्याय केले आहेत; द्वारकापुरी दग्ध केली; भोजराजास रैवतक पर्वतावरून बांधून नेलें, वसुदेवाच्या यज्ञांतील अश्व मारून टाकला, परंतु मी पितृभगिनीस आश्वासन दिल्यामुळें त्याला सर्व अपराधांची क्षमा केली, परंतु हा अपमान मला सहन होणार नाहीं. आज याचे शंभर अपराध पुरे झाले." इतकें बोलून श्रीकृष्णांनीं शिशुपालावर आपलें दिव्य

चक्र सोडून त्याचें मस्तक धडापासून वेगळें केलें व त्याचा उद्धार केला. कारण, त्याची विरोधभक्ति पूर्ण होती; आणि म्हणूनच त्याला सायुज्यमुक्ति दिली.

## पुत्र आळवितां अजामिळा । आपणपें देसी ॥

( अ. ११ ओं. १०४. )

कान्यकुब्ज देशांत पराक्षीरत व अत्यंत दुराचारी असा एक अजामिल नांवाचा ब्राह्मण राहत असे. तो चोरी वगैरे नीच कर्में करून आपलें व आपल्या प्रियतमेच्या कुटुंबाचें पोषण करीत असे. त्याला त्याच्या बायकोपासून १० अपत्यें झालीं; त्यांत नारायण नांवाचा एक सर्वांत लहान मुलगा होता, त्यावर त्याची फारच प्रीति होती; इतकी कीं, एक क्षणभर सुद्धां त्याला त्यावांचून करमत नसे. पुढें त्याचा मृत्युसमय जवळ आला, व यमदूत येऊन त्याचे पंचप्राण हरण करूं लागले, तरी तो आपल्या मुलाला नारायण नामाचा उच्चार करून एकसारखा हांका मारीतच होता. हें पाहून साक्षात् विष्णु येऊन त्यानें त्या अजामिळाचा प्राण वांचविला, आणि ते त्याला वैकुंठलोकीं घेऊन गेले. सारांश, ईश्वरनामाचा महिमा फारच अगाध आहे. कारण, तो जरी फार नीच होता, तरी त्याच्या मुखांतून सतत नारायण नामाचा घोष होत होता, म्हणून तो तरला.

## नहुषु स्वर्गाधिपति जाहला । परी राहाटीं भांबावला । तो भुजगत्व पावला ।

( अ. १८ ओंवी १४७९. )

इंद्रानें वृत्रासुराचा वध केला; परंतु त्याच्या वधानें ब्रह्महत्या त्यापुढें मूर्तिमंत येऊन उभी राहिली. तिच्या भयानें इंद्र मानस सरोवरीं जाऊन लपला, तेव्हां रिकामें पडलेलें इंद्रपद ऋषींनीं नहुष राजास दिलें. नहुष राजा मोठा विद्वान, सामर्थ्यवान, तपस्वी आणि योगी असल्यामुळें, स्वर्गाचें राज्य करण्याची त्याची योग्यता होती; परंतु संपत्तीच्या आणि ऐश्वर्याच्या मदानें त्याची बुद्धि भ्रष्ट झाली; आणि तो एके दिवशीं इंद्राणीस म्हणाला, " सांप्रत मी इंद्र आहें, त्या अर्थी तूं माझी सेवा करावीस, हें योग्य होय. " इंद्राणीनें ही सर्व हकीकत बृहस्पतीला कळविली, व पुढें काय करावें, असें त्यास विचारिलें. तेव्हां बृहस्पतीनें इंद्राणीस अशी युक्ति सांगितली कीं, " आजपर्यंत ज्या वाहनांत कोणीही बसला नाहीं अशा वाहनांत बसून तूं मजकडे ये, म्हणजे मी तुला वश होईन, असें तूं त्याला सांग. " त्याप्रमाणें इंद्राणीनें नहुषाला सांगितलें. तेव्हां नहुषानें त्या संबंधी पुष्कळ विचार केला, पण त्यास अपूर्व असें एकही वाहन आढळेना. शेवटीं, ब्राह्मणांना पालखी वहावयास लावून त्या पालखींत आजपर्यंत कोणीही बसला नाहीं, असा विचार करून, त्याच वाहनांत बसून आपण इंद्राणीकडे जावें, असा नहुष राजानें निश्चय केला. नंतर त्यानें पालखीस महान महान ऋषि लाविले; व त्यास तिकडे जाण्याची अतिशय उत्कंठा असल्यामुळें तो ब्राह्मणांस 'सर्प, सर्प,' ( लवकर चला, लवकर चला, ) असें वरचेवर म्हणून लत्ताप्रहार करूं लागला ! त्या वेळीं पालखीस लाविलेल्या ऋषींपैकीं अगस्त्य मुनींस त्याचा लत्ताप्रहर लागतांच त्यांस फार त्वेष आला; व त्यांनीं नहुष राजास ' सर्पच हो ' ! असा शाप दिला. त्यामुळें तो तत्काळ सर्प झाला; व हिमालयाच्या यामुनगिरि नामक शिखरावर पडला !

## कां गौतमाचेनि मिषें । कळिकाळज्वरितोद्देशें । पाणिढाळु गिरीशें । गंगेचा केला ॥

( अ. १८ ओंवी १६८८. )

शिष्यांसह गुरुमूर्ती । आले नाशिक क्षेत्राप्रती । तीर्थमहिमा असे ख्याती । पुराणांत परियेसा ॥६०॥ तीर्थमहिमा सांगतां । विस्तार होईल बहु कथा । संक्षेपें सांगेन आतां । तें परियेसीं ॥ ६१ ॥ त्या गौतमीचा महिमा । सांगतां अपार आम्हां । बाहिरार्णव उदक नामा । ब्रह्मांडा व्यतिरिक्त ॥ ६२ ॥ जटामुकुटीं सर्वेश्वर । धरीतसे निरंतर । मिळोनि सकळ ऋषीश्वर । उपाय केला परियेसा ॥ ६३ ॥ ब्रह्मऋषि गौतम देखा। तपस्वी असे विशेषा । बीज पेरिलें वृत्ती ऐका । अनुष्ठानाजवळी ॥ ६४ ॥ पूर्वी ऋषी मुनी सकळी । नित्य पेरूनि पिकविती साळी । ऐसे त्यांचे मंत्र प्रबळी । महातपस्वी पुण्यपुरुष ॥ ६५ ॥ समस्त ऋषी मि-

कोनीं । विचार करिती आपुले मनीं । गौतमऋषी महाज्ञानी । मुख्य दास ईश्वराचा ॥ ६६ ॥ त्यासी घालितां सांकडें । गंगा आणील आमुचे चाडे । समस्तां आम्हां पुण्य घडे । गंगा आणूनी भूमंडळीं ॥ ६७ ॥ उर्ध्वरेत मुनीश्वरांसी । कोटि वर्षें तपस्व्यांसी । जे गति होय परियेसीं । ते गति गौतमीतीरस्थां ॥ ६८ ॥ याकारणें गौतमीसी । आणावें यत्नें भूमंडळासी । सांकडें घालावें गौतमासी । गंगा आणितां आम्हां लाभ॥६९॥ म्हणूनि रचिली माया एक । दूर्वेची गाय सवत्सक । करोनि पाठविली एक । गौतमव्रिहीभक्षणार्थ ॥ ७० ॥ ऋषि होता अनुष्टानीं । देखतां धेनु नयनीं । निवाराया तत्क्षणीं । दर्भ पवित्र सोडिलें ॥७१॥ तेंचि दुर्वार जाहलें शस्त्र । धेनूसी लागलें जैसें वज्रास्त्र । पंचत्व पावली त्वरित । घडली हत्या गौतमासी ॥ ७२ ॥ मिळोनि सकळ ऋषिजन । प्रायश्चित्त देती जाण । गंगा भूमंडळी आण । यावीण तुज नाहीं शुद्धी ॥७३॥ त्याकारणें गौतम ऋषी । तप केलें सहस्र वर्षीं । प्रसन्न झाला व्योमकेशी । वर माग म्हणतसे ॥ ७४ ॥ गौतम म्हणे सर्वेश्वरा । मज प्रसन्न झाला दातारा । उद्धरावया चराचरा । गंगा यावी भूमंडळीं ॥ ७५ ॥ गौतमाचे विनंतीसी । निरोप दिधला गंगेसी । घेवोनि आले भूमंडळासी । पापक्षालनार्थ मनुष्याचे ॥७६॥

श्रीगुरूचेनि नांवें माती । डोंगरीं
जयापासीं होती । तेणें कोळियें
त्रिजगतीं । येकवद केली ॥

(अ. १८ ओवी १७३०.)

भीष्मानें द्रोणाचार्यांस, धार्तराष्ट्र आणि पांडव इत्यादि मुलांस धनुर्वेद शिकविण्यासाठीं हस्तिनापुरीं आपणासमीप ठेवून घेतल्यावर, तीं मुलें त्यासमीप अभ्यास करूं लागलीं. हें वर्तमान देशोदेशीं कळून अनेक राजपुत्र तेथें येऊन द्रोणासमीप अस्त्रविद्येचा अभ्यास करूं लागले, असें ऐकून एकलव्य नांवाचा एक किरातपुत्रही तेथें आला आणि माझा अंगीकार करून विद्या पढवावी म्हणून आचार्यांस प्रार्थूं लागला. परंतु त्यांनीं त्याचा अंगीकार केला नाहीं. त्यावरून, यानें द्रोणाचार्यांच्या पादुका मागितल्या, त्या त्यांनीं यास विमुख लावूं नये म्हणून दिल्या असतां, हा त्या घेऊन स्वगृहीं आला; आणि भक्तिपुरःसर द्रोणाचार्यांची मृण्मय मूर्ति करून, व तीपुढें आणलेल्या पादुका ठेवून, त्यांची नियमपूर्वक नित्य पूजा करीत होत्साता, इतक्यामध्यें आपणच धनुष्यबाण घेऊन उभा राही, व असें अस्त्र सोडूं ना ? म्हणून आपल्याच मनाशीं प्रश्न करी, व आपणच हो हो, असेंच सोड, म्हणून उत्तर करून सोडी. असें करतां करतां, विमोक्ष, आदान, संधान इत्यादि जीं धनुर्विद्येचीं प्रकरणें, त्यांत तो अल्प काळांतच प्रवीण झाला.

इकडे कौरव, पांडव, तसेच अन्य राजपुत्र हेही धनुर्विद्येंत प्रवीण होऊन एकदा सर्व मृगयेस गेले; व मृगामागें लागले असतां, त्यांचा मृगयाश्वान त्यांपासून दूर राहून चुकल्यामुळें, जेथें एकलव्य होता तिकडे गेला. परंतु त्यास नेहमीं सुंदर वेष केलेल्या राजपुत्रांस पाहण्याची संवय असल्यामुळें, विचित्रवेषधारी एकलव्यास पाहून, तो त्याच्या अंगावर भुंकूं लागला. तें त्याचें पसरलेलें मुख एकलव्यानें पाहून, त्यांत अशा युक्तीनें एक लहान लहान बाणांचा जुंबडा भरला कीं, त्यास भुंकतां व तोंड मिटतां येऊं नये. पुढें तो श्वान तेथून पळाला, व इकडे तिकडे हिंडत आहे तों त्यानें राजपुत्रांस व राजपुत्रांनीं त्यास परस्पर पाहिलें. नंतर तो समीप आला असतां, संपूर्ण राजपुत्रांनीं त्याच्या मुखांत भरलेला बाणांचा जुंबडा पाहतांच त्यांस अति आश्चर्य झालें, व अशी कृति करणारा धनुर्धर या अरण्यांत कोण असावा, म्हणून ते त्याचा शोध करीत चालले. जातां जातां, हस्तांत धनुष्यबाण घेतलेल्या एकलव्यास त्यांनीं पाहिलें, व हाच तो असावा, म्हणून ते सर्व तेथें उभे राहिले.

नंतर सर्व राजपुत्रांत, एकजण पुढें होऊन, त्यानें यास पुसलें कीं, तूं कोण व कोणाचा शिष्य आहेस ? यानें उत्तर केलें, मी हिरण्यधेनुक नामक निषाधिपतीचा

पुत्र असून, द्रोणाचार्यांचा शिष्य आहे. त्यावरून सर्वांस कांहींसा विषाद वाटून ते गृहीं आले, आणि आचार्यांस म्हणाले कीं, आपण आम्हांस न कळूं देतां, गुप्तपणें एक निषाद प्रवीण केला हें कसें? तें ऐकून द्रोणाचार्यांस त्याचा कांहींच संबंध ध्यानांत येईना; तथापि तो कोण असावा हें पहावें म्हणून, आचार्य हस्तिनापुरांतून राजपुत्रांस समागमें घेऊन त्यास पाहण्यास निघाले व तेथें गेले. त्यांस पाहतांच एकलव्यानें दंडवत् प्रणाम केला, व तो हात जोडून आचार्यांपुढें उभा राहिला. पुढें द्रोणाचार्यांनीं याच्या अस्त्रविद्येची परीक्षा पाहून, तींत तो उत्कृष्ट प्रवीण आहे असें जाणल्यावर त्यास पुसलें कीं, ही विद्या तूं मजपासून कशी संपादन केलीस? तेव्हां यानें संपूर्ण पूर्ववृत्त त्यांस निवेदन केलें. तें ऐकून राजपुत्र निःसंशय झाले, व याच्या भावनेचें आणि आचार्यांच्या पुण्यप्रभावाचें, त्यांस परम आश्चर्य होऊन, परस्परांशीं गोष्टी करीत आहेत तों, हा प्रसंगवशात् अर्जुनासही भारी होईल असें मनांत आणून, आचार्यांनीं यास गुरुदक्षिणा मागितली कीं, बाण सोडतांना इतःपर तूं कधींही त्यास अंगुष्ठ स्पर्शूं देत जाऊं नको. त्यावरून यानें तथास्तु म्हणून, त्या दिवसापासून बाणास अंगुष्ठाचा स्पर्श करणें सोडलें. तें व्रत अजून सर्व किरात पाळतात.




14/2